राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना शिबीरे व प्रशिक्षणे आयोजनाप्रित्यर्थ निधी वितरणास प्रशासकीय मंजुरी मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - राछासे - २७१८/प्र.क्र.२२९/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २० नोव्हेंबर, २०१८.

वाचा:- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.
२) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक एनसीसी/शिबीरेप्र/२०१८-१९(२)/का-५/४७३९ दि. ३० ऑक्टोबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रातील राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना शिबीरे व प्रशिक्षणे आयोजनाप्रित्यर्थ राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या २५ % अनुदानाची रक्कम अदा करणेसाठी सन २०१८-१९ या कालावधीत प्रस्तुत उपक्रमांच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.११.०० कोटी इतक्या तरतुदीपैकी ७० टक्केच्या मर्यादेत रु. ७.७० कोटी इतक्या निधीपैकी रु. ४,७१,११७/- इतक्या रकमेचा निधी वितरीत करण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्रातील राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना शिबीरे व प्रशिक्षणे आयोजनाप्रित्यर्थ राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या २५ % अनुदानाची रक्कम अदा करणेसाठी सन २०१८-१९ या कालावधीत प्रस्तुत उपक्रमांच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.११.०० कोटी इतक्या तरतुदीपैकी ७० टक्केच्या मर्यादेत रु. ७.७० कोटी इतक्या निधीपैकी रु. ४,७१,११७/- इतका निधी ३८ महाराष्ट्र बटालियन राष्ट्रीय छात्र सेना, सोलापूर या युनिटकरिता संदर्भ क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक: ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०२, विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्रसेना योजनेतर (२२०४-००१६-२१) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि. ०२/०४/२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित समादेशक अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर संबंधित विभागीय उपसंचालक (क्रीडा) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२/०४/२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिच्छेद ६ ते ९ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६, व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२०१५३३०५६७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra
Shankarrao
Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.11.20 15:40:25 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव
२) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७) अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्रसेना, मुंबई.
८) विभागीय उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर (संचालनालयामार्फत)
९) ३८ महाराष्ट्र बटालियन राष्ट्रीय छात्र सेना, सोलापूर
१०) निवड नस्ती, क्रीयुसे-३.